**केंद्र पुरस्कृत One Stop Crises Centre या योजनेंतर्गत जिल्हा रूग्णालय, अमरावती च्या रूग्णालयीन आवारातील ३०० चौ.मीटर जागा उपलब्ध करून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण -२०२०/प्र.क्र. ११/ आरोग्य -३**

ए विंग ,१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकुल इमारत

लोकमान्य टिळक मार्ग , मुंबई- ४०० ००१

तारीख: २८ जानेवारी, २०२०.

वाचा -

1. **शासन निर्णय, महिला व बालविकास विभाग, क्रमांक - संकिर्ण २०१७/प्र.क्र.२२२/ का-२, दिनांक- २३.०३.२०१८.**
2. **संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे क्रमांकः संआसे/ कक्ष- ३/ टे-२/ ३४७/३९-४३/१७ , दि. ३१.१०.२०१७ व १५.०१.२०२० चे पत्र**

प्रस्तावना -

संकटग्रस्त महिलांसाठी एकाच छताखाली सुविधा मिळण्यासाठी केंद्र शासनाने One Stop Crises Centre ही योजना देशभरात सुरू केली आहे. या योजनेंतर्गत राज्यातील ठाणे, रायगड, नाशिक, पुणे, सातारा, अहमदनगर, औरंगाबाद, अकोला, नांदेड, अमरावती व नागपूर या जिल्ह्यांची निवड करण्यात आली आहे. केंद्र शासनाच्या निकषानुसार सदर योजनेंतर्गत उक्त जिल्ह्यांमधील रूग्णालयीन आवारातील जागा One Stop Crises Centre करीता उपलब्ध करून देणे अपेक्षित आहे. सदर केंद्राच्या उभारणीचा खर्च केंद्र शासन करणार आहे. याबाबत जिल्हा रूग्णालय, अमरावती येथील जागा केंद्र पुरस्कृत One Stop Crises Centre करीता उपलब्ध करून देण्याचा आरोग्य सेवा संचालनालय ,मुंबई यांचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय-

केंद्र पुरस्कृत One Stop Crises Centre योजनेंतर्गत अमरावती जिल्ह्यातील जिल्हा रूग्णालय, अमरावती येथील रूग्णालय परिसरातील ३०० चौ.मी जागा One Stop Crises Centre उभारण्याकरीता या शासन निर्णयान्वये उपलब्ध करून देण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

सदर केंद्रावरील आवर्ती/ अनावर्ती खर्च आणि सर्व प्रकारचे कर इ.बाबीवरील खर्च महिला व बालकल्याण विभागामार्फ़त करण्याच्या अटीच्या अधीन राहून सदर मान्यता देण्यात येत आहे.

२. उपसंचालक अकोला मंडळ, अकोला व जिल्हा शल्य चिकित्सक, अमरावती यांनी रुग्णालयाच्या विकासाचे नियोजन विचारात घेऊन त्यासाठी लागणारी जागा वगळता पुढील विस्तारीकरणास अडथळा येणार नाही, अशी ३०० चौ.मीटर जागा शिल्लक राहत असल्यास One Stop Center साठी उपलब्ध करून द्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२८१३३२४१११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.01.29 12:02:05 +05'30'

**(रो.दि. कदम-पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती
३. विभागीय आयुक्त, अमरावती.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
६. उप संचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, अमरावती.
८. महिला व बाल विकास विभाग (कार्यासन का-२), मंत्रालय, मुंबई-३२
९. आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, अमरावती.
११. निवडनस्ती (आरोग्य-३)